**नाशिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील रा.म.मा.३ पासून पिंपळगांव (बं) बस डेपो ते (निफाड चौफुली) रा.मा.२७ ला मिळणारा रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग क्र.५२ मध्ये समाविष्ट करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०२०/प्र.क्र.८१ /नियोजन-२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २६ ऑक्टोबर,२०२०.

**पहावे** :- मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचे पत्र जा.क्र.का-५/साबांप्रादेविना/प्रआ/दर्जोन्नत/नाशिक/२४००/सन-२०२०, दि.१४.०९.२०२०.

**प्रस्तावना :-**

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांनी संदर्भाधीन पत्रान्वये नाशिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील रा.म.मा.३ पासून पिंपळगांव (बं) बस डेपो ते (निफाड चौफुली) रा.मा.२७ ला मिळणारा रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग क्र.५२ मध्ये करणेबाबत प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. तसेच ग्रामपंचायत, पिंपळगाव बसवंत यांनी सदर रस्ता समाविष्ट करणेबाबत मागणी केलेली आहे.

सदर रस्त्याचा होणारा वापर तसेच ग्रामपंचायत, पिंपळगाव बसवंत यांचा ठराव विचारात घेता सदर रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग क्र.५२ मध्ये समाविष्ट करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक यांचा प्रस्ताव व ग्रामपंचायत, पिंपळगाव बसवंत यांचा ठराव विचारात घेऊन नाशिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील रा.म.मा.३ पासून पिंपळगांव (बं) बस डेपो ते (निफाड चौफुली) रा.मा.२७ ला मिळणारा रस्ता प्रमुख जिल्हा मार्ग क्र.५२ मध्ये समाविष्ट करण्यात येत आहेत. प्रजिमा ५२ ची पुर्वीची एकूण लांबी १६.५०० कि.मी. अशी असून, त्यामध्ये सदर रसत्याची ०.८५० कि.मी. लांबी समाविष्ट केल्यानंतर प्रजिमा ५२ ची एकूण लांबी १७.३५ कि.मी.अशी होईल.

तसेच **प्रजिमा ५२ चे नामाभिधान- वरखेडी मातेरेवाडी जोपुळ चिंचखेड पिंपळगाव ते रा.म.मा.३ पासून पिंपळगांव (बं) बस डेपो ते (निफाड चौफुली) रा.मा.२७ ला मिळणारा रस्ता असे होईल.**

परिणामी, रस्ते विकास योजना २००१-२०२१ मधील नाशिक जिल्ह्यातील प्रमुख जिल्हा मार्ग दर्जाच्या रस्त्यांच्या एकूण लांबीत **०.८५० कि.मी.** ने वाढ होवून एकूण लांबी (४३४१.२६+०.८५० ) म्हणजेच **४३४२.११ कि.मी**. इतकी होईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०२६१३०७१७४५१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.10.26 13:11:19 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
२) विभागीय आयुक्त, नाशिक.
३) अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नाशिक (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा.)
४) जिल्हाधिकारी, नाशिक.
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नाशिक.
६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय.
९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
१०) निवडनस्ती.